उप विभागीय कार्यालय, मिरज, जिल्हा सांगली अंतर्गत १६ नवीन तलाठी कार्यालये तथा निवासस्थाने बांधकामाच्या अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीएलडी-३६१४/प्र.क्र.१७/ई-८,**

३२ वा मजला, सेंटर -१ इमारत,जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
तारीख: २१ जानेवारी, २०१५.

**वाचा:-**

जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र. साशा-१/कार्या-४/प्रशा/आरआर/१४८२/१३, दिनांक १७.१२.२०१३

**शासन निर्णय:-**

सांगली जिल्ह्यातील उप विभागीय अधिकारी कार्यालय, मिरज अंतर्गत १६ नवीन तलाठी कार्यालये तथा निवासस्थाने बांधकामाच्या रु. १,३५,२२,७९०/- ( अक्षरी रुपये एक कोटी पस्तीस लक्ष बावीस हजार सातशे नव्वद फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रकाची सर्वसाधारण तपासणी करुन घेण्यात आली असून त्यात खालील बाबी आढळून आल्या आहेत.-

१) सदर कामाचे अंदाजपत्रक उप मुख्यवास्तुशास्त्रज्ञ यांनी तयार केलेल्या नकाशे व आराखड्यावर आधारित आहे.

२) अंदाजपत्रके उप अभियंता, सा. बां. उपविभाग, कवठेमहांकाळ, जि. सांगली यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा. बां. विभाग, मिरज यांनी साक्षांकित केली आहेत.

३) अंदाजपत्रक सन २०१३-१४ च्या जिल्हा दरसूचीवर आधारित आहे.

४) अंदाजपत्रकात ४ टक्के आकस्मिक खर्च, ६ टक्के विद्युतीकरण, ४ टक्के बाह्यपुरवठा, दरसुचीतील वाढ १० टक्के, सेंटेज चार्जेस ४ टक्के इ. तरतूदी योग्य करण्यात आली आहेत

तर कामाच्या विम्याची तरतूद वगळण्यात येत आहे.

५) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

३. वरील प्रमाणे सुधारणा व दुरुस्त्या करुन खाली नमूद केलेल्या १६ बांधकामांच्या रु. १,३५,२२,७९०/- इतक्या रकमेस वरील परिच्छेद क्र. २ मधील नमूद ५ अटीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाची सहमती आहे.

| अ.क्र. | तलाठी कार्यालयाचे ठिकाण | अंदाजित किंमत | छाननीअंती किंमत |
|---|---|---|---|
| १. | दुधेभावी | रु. ९,३०,५४१/- | रु. ८,४७,९०७/- |
| २. | करोली (टी) | रु. ८,८४,६११/- | रु. ८,०६,०५५/- |
| ३. | घोरपडी | रु. ९,२७,७५७/- | रु. ८,४५,३७३/- |
| ४. | तिसंगी | रु. ९,२२,५१४/- | रु. ८,४०,५९२/- |
| ५. | ढालगांव | रु. ९,३५,०५०/- | रु. ८,५२,०१५/- |
| ६. | धुळगांव | रु. ९,०१,३८८/- | रु. ८,२१,३४२/- |
| ७. | मळणगांव | रु. ९,३३,३९४/- | रु. ८,५०,५०६/- |
| ८. | शिरढोण / जायगव्हाण | रु. ९,२६,११६/- | रु. ८,४३,८७४/- |
| ९. | खरसिंग | रु. ९,२६,३१५/- | रु. ८,४४,३२८/- |
| १०. | कुची | रु. ९,३४,७९९/- | रु. ८,५१,७८६/- |
| ११. | हरोली | रु. ९,२६,६१५/- | रु. ८,४४,३२८/- |
| १२. | बोरगांव | रु. ९,२६,६१५/- | रु. ८,४४,३२८/- |
| १३. | कवठेमहांकाळ | रु. ९,५५,०३९/- | रु. ८,७०,२२९/- |
| १४. | कोकळे | रु. ९,४९,८५८/- | रु. ८,६५,५०८/- |
| १५. | आगळगांव | रु. ९,२४,५९४/- | रु. ८,४२,४८७/- |
| १६. | आरेवाडी | रु. ९,३५,१२९/- | रु. ८,५२,१३२/- |
| | **एकूण** | **रु. १,४८,४०,६३५/-** | **रु. १,३५,२२,७९०/-** |

४. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना जिल्हा प्रशासन - मागणी क्रमांक एच-८" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा. मात्र सदरच्या खर्चासाठी अंदाजपत्रकामध्ये तरतुद केल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये.

५. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६८/इमा-३, दिनांक ११/०२/२०१४ च्या सहमतीने तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वि.अ.प्र./१००८/प्रक्र-७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२११२१९१७९५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.01.21 16:06:11 +05'30'

( चं. नि. पाडळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, पुणे.
२. जिल्हाधिकारी, सांगली.
३. प्रधान लेखापाल महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
४. महालेखापाल महाराष्ट्र १ (लेखा परिक्षा), मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
६. तहसिल कार्यालय, मिरज, कवठेमहांकाळ, जिल्हा सांगली.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई-३२.
९. वित्त विभाग, कार्यासन (अर्थसंकल्प-१२ व व्यय-९) मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई-०५.